"अल्लाहच्या नावाने जो असीम दयावंत व परम कृपावंत आहे"

# भूमिका

लेखकाचे एक लोकप्रिय पुस्तक "इस्लाम एक स्वयं सिद्ध ईश्वरीय जीवन व्यवस्था" यातील एक अत्यंत महत्त्वपूर्ण लेख 'इस्लाम' या पुस्तिकेत प्रस्तुत केला आहे. सदर पुस्तकाची भूमिकासुद्धा थोडक्यात येथे दिली जात आहे.

वृद्धावस्थेत मला सेवानिवृत्तीनंतर आध्यात्मिक आणि मानसिक शांतीची तीव्र आवश्यकता वाटली. या संदर्भात मला माझ्या धर्मबांधवांशी चर्चा करावी लागली. तुलनात्मक विश्लेषण आणि मनन केल्यानंतर मला इस्लाम मानवी समस्या सोडविण्याचा आधारभूत आणि एकमेव रूपाने मिळाला. ही समस्या व्यक्तिगत असो, पारिवारिक असो, सामाजिक, राजनैतिक, नैतिक, धार्मिक, मनोवैज्ञानिक, आर्थिक, राष्ट्रीय, आंतरराष्ट्रीय, इहलौकिक अथवा पारलौकिक असो, या सर्वांसाठी एकच चावी आहे, 'इस्लाम'. इस्लामचा असा स्पष्टवक्तेपणा, शक्ती, साधेपणा, सार्वभौमिकता, प्रामाणिकपणा शोधूनही सापडणार नाही. एकेश्वरत्व आणि सत्य व खरा एकेश्वरत्व प्रत्यक्षात आहे. त्याचबरोबर इस्लामचे पैगंबर मुहम्मद (स.) यांचे व्यक्तित्त्व अप्रतिम व संपूर्ण आहे. जर कोणी व्यक्ती स्वच्छ मनाने आणि पक्षपात न करता समजून घेण्याचे प्रयत्न करील तर निश्चितच अशा निर्णयाला पोहोचेल की इस्लाम एक स्वयंसिद्ध वास्तविकता आहे. इस्लामपूर्वी अरब साक्षात पापी होते. ते हरप्रकारची पापे करीत. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी इस्लामच्या शिकवणीने फारच कमी काळात संपूर्ण धार्मिक आणि मानवतेचा आदर्श समाज घडविला. एवढेच काय तर कामुक, क्रोधी, लोभी, व्यभिचारी, जुगारी, भांडखोर, दारूड्या, हिंसक, चोर आणि दुष्ट अंधविश्वासू लोकांचे हृदयपरिवर्तन त्या पिढींत करणे हा एक चमत्कारच म्हटले पाहिजे आणि असे उदाहरण इतिहासात मिळणार नाही. जर अरबांतील सामूहिक अपराधी स्थायीप्रवृत्तीचा रोग इस्लामरूपी (जालीम) औषधाने अल्पकाळात बरा झाला तर हेच औषध ऐतिहासिक प्रमाण मानून साऱ्या मानवसमूहासाठी अशाच प्रकारच्या रोगावर उपयोग मान्यताप्राप्त व्हावा. या वेळी सगळ्या जगात या प्रकारचा रोग कमी-अधिक प्रमाणात पसरला आहे. भारतात मात्र याची लागण महामारीचे रूप धारण करीत आहे. ज्याच्यासाठी ईश्वरी औषधांचा वापर अनिवार्य आहे, आवश्यक आहे.

इस्लामचे कोणत्याही धर्माशी वैर नाही. इस्लाम यापूर्वी अवतरित सर्व पैगंबरांचा आदर करतो. अशी मान्यता आहे की मुहम्मद (स.) या पैगंबरांच्या साखळीतील अंतिम पैगंबर आहेत. यांच्यापूर्वी अन्य पैगंबरांद्वारा अवतरलेले ईशआदेश स्वार्थी लोकांनी काळाच्या ओघात बदलले. परिणामस्वरूप मानव सत्य मार्गापासून विचलित झाला. इस्लामच्या रूपात मानवाला ईशनिर्देशांच्या स्वरूपात अंतिम, सुधारित आणि बदल न होणारे नियम दिले गेले.

मी विशेषकरून माझ्या सहकारींना, सहधर्मी हिंदूना अनुरोध करतो की ते माझ्या निष्कर्षाला आपल्या बहुतगर्वित सहिष्णुता आणि विचारस्वातंत्र्य विचारांनी पाहावे आणि इस्लाम आणि मुहम्मद (स.) यांना खुल्या मनाने समजण्याचे प्रयत्न करावे. आणि त्यांच्या बाबतीत शंकेचे निराकरण करावे. असे केल्याने विचारस्वातंत्र्याचा सिद्धान्त फायदेशीर ठरेल. गौरवपूर्ण ठरेल.

**राजेंद्र नारायण लाल** (एम.ए.)

वाराणासी

जुलै १९७८

# इस्लाम

इस्लामच्या मूल्यांकनापूर्वी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या व्यक्तित्त्वाचे मूल्यांकन करणे आवश्यक आहे, ज्यांच्यामार्फत ईश-निर्देश, आज्ञा कुरआनच्या स्वरूपात अंतिम आदेश अवतरित झाले आहेत. राम, बुद्ध आणि महावीरप्रमाणे आदरणीय मुहम्मद (स.) यांचा जन्म राजघराण्यात झाला नाही, त्यांच्या जन्माचा उत्सव साजरा झाला नाही, त्यांचे पालनपोषण सुखाने झाले नाही. त्यांच्या शिक्षणाचीही व्यवस्था नव्हती. ते आईच्या पोटात असताना वडिलांचा मृत्यू झाला. सहा वर्षाचे वय असताना आईही वारली. आठ वर्षाचे असताना आजोबाही देवाघरी गेले. केवळ एक काका अबू-तालिब यांनी त्यांच्याप्रति सहानुभूती आणि दया दाखविली. या प्रकारे शिक्षणापासून, सुखशांतीपासून वंचित राहिले. चाळीस वर्षाच्या वयापर्यंत प्रामाणिकपणे सदाचाराचे जीवन जगत राहिले आणि समाजात त्यांच्या वागणुकीमुळे त्यांना 'अमीन' म्हटले गेले. जन्मापासून ते प्रेषित्त्व प्राप्त होईपर्यंत व इस्लामला पूर्णपणे प्रतिष्ठा मिळेपर्यंत आणि परलोक गमन होईपर्यंत अशिक्षित राहिले. चाळीस वर्षाचे झाल्यावर त्यांना ईशज्ञान प्राप्त झाले. सर्वप्रथम त्यांची पत्नी ख़दीजा व त्यानंतर त्यांच्या काकांचा अल्पवयीन मुलगा अली, दास ज़ैद आणि मित्र अबू-बकर यांनी पैगंबरांच्या प्रेरणेने इस्लाम धर्म स्वीकारला आणि त्यानंतर जवळचे लोक हळू हळू इस्लाम स्वीकारण्यासाठी पुढे आले. त्याचबरोबर निधर्मी व मूर्तीपूजक ज्यांची संख्या दिवसें दिवस वाढत गेली, विरोध करू लागले. जेव्हा ते पैगंबरांना राज्यसत्तेचे आमिष व नाना प्रकारची प्रलोभने देऊन थकले तेव्हा मग त्यांनी त्यांच्यावर आणि त्यांच्या अनुयायांवर भयंकर अत्याचार सुरू केले. त्याचा परिणाम असा झाला की त्रस्त लोक स्वदेशाचा त्याग करून इथोपिया (हबश) देशात निघून गेले. तेथेही त्यांचे वैरी कुरैशांनी[१] त्यांचा पिच्छा सोडला नाही. परंतु तेथील शासक[२] इस्लामची सत्यता जाणून प्रभावित झाला आणि त्याने शरणार्थींना कुरैशांकडे सुपूर्द न करता देशात राहू दिले.

इकडे मक्केत मुहम्मद (स.) आणि त्यांच्या अनुयायींवर अत्याचार खूपच वाढल्यावर मुहम्मद (स.) यांना जिवे मारण्याचे षड्यंत्र रचले गेले. ईशप्रेरणेने त्यांना

---

१. कुरैश, अरबांचा एक प्रतिष्ठित गोत्र आहे. अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) याच गोत्रांत जन्मले. सर्व वंशात आणि गोत्रांत या गोत्राची सामाजिक महत्ता होती, परंतु बहुदेववादी धार्मिक प्रभुत्त्व इस्लामला धोकादायक समजू लागला. याच कबिल्याने (गोत्र) इस्लामचा सर्वशक्तिशाली विरोध केला आणि दुसऱ्या कबिल्यांना एकजुट केले.

२. इथोपियाचा शासक 'नज्जाशी' उपाधीने प्रसिद्ध व धर्माने ख्रिस्ती होता.

देश सोडून मक्केहून मदीनाकडे जावे लागले. या घटनेला अरबी भाषेत 'हिजरत' म्हणतात, अर्थात धर्मासाठी देशत्याग. परंतु तेथेही कुरैशांनी शांत राहू दिले नाही व मदीनेवर सशस्त्र आक्रमण आरंभ केले. तेव्हा याचा परिनाम असा झाला की अल्लाहचे पैगंबर व मुस्लिमांना प्रतिरक्षात्मक युद्ध अर्थात जिहादसाठी परवानगीची आयत (श्लोक) अवतरित केली. शेवटी थोड्या काळातच मुहम्मद (स.) आणि इस्लामचे राज्य प्रस्थापित झाले. अरब समुदाय जो मूळ रूपाने अत्यंत दुष्ट प्रवृत्तीचा होता. जसे अशिक्षित, बेशिस्त, अंधविश्वासू, जुगारी, लूटमार करणारे, व्यभिचारी, इथपर्यंत की ते वडिलांच्या मृत्यूनंतर सावत्र आईशी विवाह करीत.

दारू पिणे, भांडण करणे, कन्यावध करणे, मुलींना जिवंत गाडणे, धोका देणे, अन्याय करणे, षड्यंत्र रचणे, स्त्रियांवर अत्याचार करणे, सेवकांवर अत्याचार, अनाथांचे हक्क हडप करणे, मूर्तिपूजा यासारखे व अन्य प्रकारचे अपराध पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या जीवनकाळांत २० वर्षाच्या प्रयत्नांचे फळ म्हणून पूर्ण पिढी एकेश्वरवादी झाली, मुस्लिम झाली, धर्मात्मा झाली. इतर धर्माच्या पुस्तकांत या भ्रष्ट व पापी जातीचे नामकरण राक्षसाच्या स्वरूपांत झाले असते आणि एखाद्या देवता आणि अवतारच्या माध्यमाने राक्षसाचा वध अथवा नाश दाखविला असता. परंतु या ऐतिहासिक चमत्कारांत मुहम्मद (स.) यांनी पापी समाजाचा नाश न करता पापाचा नाश केला. या प्रकारे "दुराचारीची घृणा न करता त्याच्या दुराचाराची घृणा करावी" ही म्हण इस्लामद्वारा पैगंबरांनी साकार करून दाखविली. थोडक्यात जुनाट दुखण्यावर हा जालीम उपाय लागू पडला आणि अरब समाज स्वस्थ व निरोगी झाला. सामूहिक प्रतिरूपी रोगाचे मुहम्मद (स.) यांनी यशस्वीरित्या निदान केले याला ऐतिहासिक चमत्कारच म्हटले पाहिजे. अरब जातीचा हा रोग त्याच जातींत उत्पन्न झाला होता आणि वैद्यही त्याच जातीत जन्मला होता, परंतु सर्वापासून वेगळा असा होता. सत्य आहे की इस्लामची नैतिकता ही जालीम उपाय आहे. या प्रकारच्या रोगासाठी अन्य जातीसाठीही उपचार योग्य आहे, समर्थ आहे. इस्लामपूर्व अरब जातीचा इस्लामनंतर कायापालट झाला म्हणजे ऐतिहासिक पुनर्जन्म झाला. खरं तर पुनर्जन्माची कल्पनाही पूर्ण काल्पनिक आहे. सगळ्यात आश्चर्याची गोष्ट की मुहम्मद (स.) यांच्या मक्का विजयात रक्तपात न होता, कोणाचा जीव न जाता, शत्रू शरण आला व पैगंबरांनी कसलाही बदला न घेता सगळ्यांना खुल्या दिलाने माफ केले. युद्धानंतर विजेत्याने असे सामूहिक क्षमादान केलेले इतिहासात सापडणार नाही. याउलट इतर धार्मिक पुस्तकांत, ग्रंथांत मात्र अवतार आणि देवतांनी दैत्यांचा संहार व वध केला आहे. इस्लामच्या शुद्ध प्रकाशाने परिपूर्ण होऊन

अरब स्वत: अंधारातून बाहेर पडले आणि एका शतकात विद्युतगतीने संसाराच्या विशाल भू-भागावर चोहोंकडे लखलखणाऱ्या प्रकाशाने प्रकाशित केले. मुहम्मद (स.) यांच्या साधेपणात धनाढ्य स्त्रीबरोबर लग्नानंतर फरक पडला नाही आणि प्रेषित्व प्राप्त झाल्यानंतर व अरब राष्ट्राचे सर्वेसर्वा झाल्यानंतरही त्यांचे वागणे साधे होते. आपले सर्व आयुष्य अत्यंत साधेपणाने उपभोगले. सर्व जातींवर, सर्व धर्मांवर परोपकार केले. ते इतके दानशूर होते की दुसऱ्याची गरज भागविण्यासाठी स्वत: कर्ज घेत. त्यांच्यात कसलाही नैतिक दोष नव्हता. ते स्वत: सत्यता, ईमानदारी, पवित्रता, दया, सौजन्य आणि शांतिदूत, उदारता आणि दयेचे प्रतीक होते. ते खऱ्या अर्थाने केवळ दुसऱ्यांसाठीच जगले. त्यांचे पुण्य अपरंपार होते. श्रमाचा गौरव केला, समानता व बंधुभाव कायम केला. सहयोगाची भावना वृद्धिंगत केली. शांती तसेच युद्धकाळांत असे कार्य केले नाही की लोक त्यांना प्रमुख समजावे. युद्ध आणि शांतीच्या काळात आश्चर्यकारकरित्या ते नम्र, उदार आणि क्षमशील असत. दैनिक गृहस्थ जीवनात नेहमी ईशचिंतन करीत असत व सर्वांसाठी आणि विरोधकांसाठीही ईश्वराजवळ प्रार्थना करीत. रात्रीतून उठून नमाज पढत. एकदा माननीय आएशा (रजि.) यांना जी त्यांची पत्नी होती असा भ्रम झाला की कदाचित दुसऱ्या पत्नीकडे गेले असतील. परंतु उठून पाहिले तर पवित्र मस्तक ईश्वराच्या आराधनेत भूमीवर नतमस्तक होते. त्यांनी स्वत:ला ईश्वराला समर्पित केले होते. ईश्वरावर अतूट श्रद्धा होती. अगदी लहानसहान गोष्टीसाठी ईश्वरावर निर्भर होते. या प्रकारचे ईश्वर समर्पित पवित्र गृहस्थजीवन हा खरा योग आणि वैराग्य होता. ''पाण्यात कमळाचे पान''प्रमाणे त्यांचे जीवन होते. ही खरी तपस्या होती. त्यांच्या पैगंबरीचे प्रमाण त्यांची अपूर्व सफलता आणि इस्लाम धर्माची जगातील प्रतिष्ठा आहे. प्रारंभिक शिक्षण नसताना स्वयं ईश्वराने कुरआनरूपी अमर्याद ज्ञान दिले, हे दर्शविते की ते पैगंबर होते.

मुहम्मद (स.) आणि इस्लामची महत्ता आणि क्रांतिकारी प्रभावाची पुष्टी इतिहासातून मिळते. पूर्वाग्रही आणि दुराग्रही उमर जे पुढे माननीय उमर ( रजि.) म्हटले गेले आणि मुहम्मद (स.) यांचे दुसरे प्रभावी खलीफा झाले, उघडी तलवार घेऊन मुहम्मद (स.) यांना जिवानिशी मारण्यासाठी घरातून बाहेर पडले. (बहिणीच्या घरी) कुरआनच्या काही आयती (श्लोक) ऐकून त्यांच्या मनात उथलपुथल झाली आणि हृदयपरिवर्तन झाले. तात्काळ त्या स्थितीत तलवार घेऊनच मुहम्मद (स.) यांच्या सेवेत उपस्थित होऊन इस्लामचा स्वीकार केला. हीच परिस्थिती तुफैल बिन अम्र दौसीची झाली जो मुहम्मद (स.) यांच्या श्लोकापासून स्वत:चा बचाव करण्यासाठी कानात कपाशी ठेवत असत. ते मुहम्मद (स.) यांच्याकडून काही आयती (श्लोक) ऐकतात आणि तात्काळ मुस्लिम होतात.

साधनहीन आणि अनाथ म्हणून जगले, सर्व आयुष्य सांसारिक शिक्षेपासून वंचित, किंतु ईशज्ञानाने विभूषित, अत्याचार सहन करीत, दुसऱ्यासाठी दुआ करीत, अपरिहार्य परिस्थितीत ईशआदेशाने प्रतिरक्षात्मक युद्ध करीत, युद्धांत पूर्ण विजय प्राप्तीनंतर घोर अत्याचार करणाऱ्यांवर क्षमादान करीत, आपल्या जीवनकाळात राक्षसीवृत्तीच्या अरबांना पुण्यात्मा करून टाकले.

त्यानंतर एका शताब्धीत संसाराच्या विशाल भूभागावर इस्लामची प्रतिष्ठा कायम झाली. आज सर्वाधिक लोकप्रिय, विश्वव्यापी धर्म असल्या कारणाने मुहम्मद (स.) आणि इस्लामची शक्ती स्वयंसिद्ध आहे. अत्याचारांना सहन करीत धैर्याने ईशशक्तीद्वारा प्रगती करत घोर संघर्षादरम्यान ते सफल झाले. त्यांचा उद्देश होता सत्य धर्माच्या रूपात 'इस्लाम'. जर वैज्ञानिक सिद्धान्त 'जीवन संग्राम' आणि 'बळी तो कान पिळी' खरे आहे आणि हा सिद्धान्त वस्तुत: वैज्ञानिक असल्याने खरा आहे. तर व्यक्ती आणि ईश दूताच्या रूपात पैगंबर मुहम्मद (स.) आणि धर्मरूपात 'इस्लाम' या सिद्धान्तावर खरे उतरतात. पैगंबराची महान ओळख हीच आहे की संघर्षात त्यांनी नैतिकतेचा काडीमात्र ऱ्हास होऊ दिला नाही. रामाने बालीचा वध करताना झाडाच्या आडून बाण सोडला आणि रावणाचा वध करतांना भाऊ विभिषणची मदत घेतली. रावणाच्या नाभींत अमृतचे रहस्य माहीत करून घेण्यासाठी त्यांची मदत घेऊन राजनीतीचा परिचय दिला. याच प्रकारे कृष्णाने द्रोणाचार्यांच्या हत्येसाठी अश्वत्थामा नामी हत्तीला मारून युधिष्ठिरद्वारा जोरात नर आणि हळूच हत्ती म्हणून द्रोणाचार्याला आपला पुत्र अश्वत्थामाच्या तथाकथित मृत्यूने घाबरून निशस्त्र झाल्यानंतर हत्या केली. द्रोणाचार्यप्रमाणे जयद्रथ हत्येसाठी संध्याकाळ नसताना संध्याकाळचे मायाजाळ रचून राजनीतीचा परिचय दिला. परंतु याच्या विपरीत पैगंबर मुहम्मद (स.) यांनी बद्रच्या वेळी जेव्हा सैनिकांची कमतरता होती,[१] दोन सैनिकांना त्यांच्या विनवणीचा स्वीकार न करता सेवेत घेतले नाही. याचे कारण असे झाले की त्या लोकांना विरोधी पक्षाने पकडल्यानंतर सुटकेसाठी वचन दिले होते की आम्ही मुहम्मद (स.) यांच्याकडून लढणार नाही. ही मुहम्मद (स.) यांची अद्भुत नैतिकता होती.

मक्का विजयानंतर मुहम्मद (स.) यांनी त्या क्रूर गुंडालादेखील क्षमा केली ज्याने त्यांच्या एका मुलीला उंटावरून पाडून त्रास दिला होता. इतिहासात या प्रकारचे क्षमाशीलतेचे उदाहरण सापडणार नाही. यात शंका नाही की, मुहम्मद (स.) ईशदूतांत सर्वश्रेष्ठ आहेत. 'इस्लाम' आपल्या नावानेच महत्त्वपूर्ण आणि अर्थपूर्ण आहे.

---

१. इस्लामी सैनिकांची संख्या ३१३ होती आणि शत्रूसैनिक जवळजवळ १००० होते. इस्लामी सेनेजवळ लढाईसाठीची हत्यारे व अवजारे कमी होती. शत्रूकडे ती सामुग्री पुरेपूर होती.

'इस्लाम'चा अर्थ आहे. "ईश्वराच्या इच्छेपुढे पूर्णपणे समर्पण करून नतमस्तक होणे." अर्थात पूर्णपणे ईश्वराचा आज्ञाकारी दास होणे. याप्रमाणे सुरुवातीलाच इस्लाम एकेश्वरत्वाचा सूचक होतो. इस्लाम मोहम्मडनिज्म नाही.[१] तो ईश्वराने दिलेला आदि धर्म आहे. मुहम्मद (स.) हे अंतिम पैगंबर होते, हे इस्लाम नावानेच सिद्ध होते.

याउलट हिंदू धर्माचा विश्वसनीय अर्थ नाही. बौद्धिक धर्म आणि ईसाई धर्म केवळ संस्थापकांशी संबंध सूचित करतात आणि व्यापकता दाखवत नाहीत. कोणत्याही धर्माचा नकार अथवा निंदा 'इस्लाम' करीत नाही. याउलट जगाच्या प्रत्येक भूभागावर अवतरलेल्या मुहम्मद (स.) यांच्या पूर्वीचे समस्त प्रेषितांच्या प्रति आदर प्रकट केला जातो. इस्लामची मान्यता आहे की सर्व धर्म मूलत: एकच होते.[२] कालांतराने जेव्हा बदल घडत गेले आणि प्रक्षिप्त गोष्टी सामील होत गेल्या आणि लोक ईशनिर्देशापासून दूर गेले तेव्हा ईश्वराने मुहम्मद (स.) द्वारा कुरआनचे अवतरण केले.

"ला इलाहा इल्लल्लाह मुहम्मदुर्रसूलुल्लाह"

इस्लाम धर्माचा कलिमा, मूळमंत्र, ब्रीदवाक्य आहे.

(अल्लाहशिवाय दुसरा कोणी ईश्वर नाही आणि मुहम्मद (स.) अल्लाहचे पैगंबर आहेत.)

## इस्लामचे पाच अध्यादेश

(१) तौहीद अर्थात एकेश्वरत्व, (२) नमाज अर्थात शारीरिक प्रार्थना, (३) ज़कात अर्थात अनिवार्य धर्मदान, (४) रोजा अर्थात व्रत, उपवास (वर्षात एक महिना रमज़ानचे), (५) हज अर्थात मक्केतील काबाची तीर्थयात्रा.

बौद्ध धर्माचे नास्तिकवाद होण्याच्या अवस्थेत एकेश्वरत्वाचे त्यांत स्थान नाही आणि अन्य धर्मांत स्पष्ट अध्यादेशांच्या रूपात नियम उपलब्ध नाहीत. जरी अप्रत्यक्षपणे नैतिक आदर्शाच्या रूपात इथूनतिथून तोडूनजोडून नियम तयार केले

---

१. दुराग्रही ईसाई जगताने इस्लामची व्यापकता आणि सार्वभौमिकता असीम गुणांना सीमित करण्यासाठी व जुन्या ईशधर्माला एक व्यक्ती 'मुहम्मद साहिब'पर्यंत संकुचित करण्यासाठी 'मोहमडनिज्म' शब्द प्रचलित केला. याचा अर्थ असा की इस्लाम एक धर्म नाही. मानवाने निर्माण केलेली विचारधारा आहे. जसे ईसाच्या प्रचारित धर्माला 'ईसाई धर्मा'चे नाव देऊन प्रचलित केले.

२. मूळ धर्म प्रत्येक काळात, प्रत्येक प्रेषितद्वारा प्रचारित व प्रसारित इस्लाम (ईशआज्ञापालन) राहिला आहे. हे होऊ शकते की त्या काळी मानवाच्या भाषेत काही नाव असावे. परंतु आधार सदा एकेश्वरत्व, ईशदूतत्व व परलोकत्वावरच असेल. ईश्वरापुढे पूर्ण समर्पण हाच अर्थ असावा.

जावेत, हीच अवस्था कमी-अधिक प्रमाणात ईसाई धर्मातही आहे. ईश्वराच्या पुत्राच्या रूपात ईसाची मान्यताही एकेश्वरवादी ईसाई समाजात संपलेली आहे. इस्लामचे पाचही अध्यादेश जुन्या हिंदू धर्मांतही आढळतात, जरी ते विखुरलेले आहेत, कठीण बनविलेले आहेत व अन्य प्रकारे त्यावर आवरण टाकलेले आहे. इस्लामने या नियमांना संक्षिप्त व सोपे केले. नियमित व काही परिस्थितीत सूट देण्यात आली आहे. जिथे हिंदू धर्मात या पाच नियमांचे वैयक्तिक अनुकरण आहे तिथे इस्लामने यांना सामाजिक अनुकरणासाठी वापरले. याप्रकारे इस्लाममध्ये शुद्ध रूपाने हे नियम सरळ, सर्वांना सहज शक्य, समाजवादी दृष्टिकोनातून पुढे आलेले आहेत. त्यामुळे सर्वोत्तम धर्माच्या रूपाने प्रतिष्ठित इस्लाम दिसतो.

प्राचीन वैदिक साहित्यांत मानवसभ्यता प्रारंभ झाल्यापासून एकेश्वरत्वाची घोषणा ''एकमेव द्वितियो नास्ति''च्या स्वरूपात केली. अर्थात ईश्वर एक आहे आणि दुसरा नाही. कृष्णाच्या गीतेंत ईश्वराला 'ज्योतिषाम् पितज्ज्योति' अर्थात प्रकाशाचा प्रकाश म्हटले गेले आहे. ईश्वराचीही विशेषता तीच आहे जी कुरआनमध्ये 'नुरून अला नूर' (२४:३५) म्हटले आहे. उपनिषदमध्ये वारंवार म्हटले आहे, 'तमसो मा ज्योतिर्गमय', अर्थात आम्हाला अंधकारांतून प्रकाशात आणावे. पैगंबर मुहम्मद (स.) यांची हीच विशेष दुआ होती.[१]

ईश्वराला गीतेत 'विश्वतोमुखम्' म्हटले आहे, अर्थात ईश्वराचे तोंड चारही दिशेला आहे. कुरआनमध्ये म्हटले आहे, ''कुणीकडेही तोंड करा तिथे ईश्वर आहे.'' (२:११५) गीता ईश्वराला 'सर्वलोकमहेश्वरम्' घोषित करते. अर्थात ईश्वर सर्वांचा मालक आहे. कुरआनात ठीक असेच शब्द ईश्वरासाठी आहेत, 'रब्बुल आलमीन' (१:१). गीतेत ईश्वराला 'सत्य' म्हटले आहे. कुरआनात ईश्वराला 'हक़' (२२:६२) म्हटले आहे. गीता आणि कुरआनात ईश्वरासाठी म्हटले आहे की 'त्याच्यासमान कोणी नाही.' कुरआन (४२:११) गीता आणि उपनिषदमध्ये म्हटले आहे की 'सर्व ब्रह्मांड ईश्वराने वेढलेले आहे.' ठीक त्याचप्रमाणे कुरआनमध्ये म्हटले आहे की 'अल्लाहने सगळ्यांना घेरले आहे.' (४:१२६) गीतेत ईश्वराला 'अक्षर अर्थात कधीही नाश न

१. ''हे अल्लाह! माझ्या हृदयात प्रकाश (नूर) निर्मित कर, माझ्या कानांत, डोळ्यांत प्रकाश टाक, माझ्या उजवीकडे आणि डावीकडे प्रकाशमय कर, माझ्या पुढे, मागे, वर, खाली प्रकाश टाक, आणि प्रलय दिनी माझे प्रकाश (नूर) वाढवून दे.''

''(ऐ पालनहार) आम्हाला सरळ मार्ग दाखव.''

पावणारा आणि इतरांना नाशवंत म्हटले आहे. (दुष्टता संपणार) कुरआनमध्ये म्हटले आहे की 'सर्व गोष्टी मिटतील. बाकी राहणारा केवळ 'अल्लाह' आहे.' (५५:२६) गीतेत ईश्वराला "आचिंत्य" आणि "अनिर्वचनीय" म्हटले गेले आहे. अर्थात, 'बुद्धीच्या पलीकडे' आणि 'वर्णन न करण्यायोग्य'. कुरआनातसुद्धा ईश्वरासाठी म्हटले गेले आहे, 'त्याच्यासारखी कोणतीही वस्तू नाही. ज्याला मानवाचा डोळा पाहू शकेल आणि (बुद्धी) समजू शकेल.' (६:१०३)

इतिहासानुसार वैदिक साहित्य आणि गीतेचा संबंध त्या वेळच्या अरबचा धर्म, धार्मिक विचाराशी नव्हता. इतिहासात हे ज्वलंत उदाहरण आहे की गीता आणि कुरआन एकेश्वरत्वावर सहमत आहेत आणि धर्मयुद्ध व जिहादसारख्या प्रेरक व उद्बोधक गोष्टींत सहमत आहेत. म्हणजेच गीताही मुहम्मद (स.) यांना प्रेषिताच्या रूपात मान्य करते आहे.

दुसरे नियम 'नमाज' आणि उपासना, प्रार्थनेबाबत विशाल हिंदू साहित्यांत वर्णन आलेले आहे. याच प्रार्थनेस, उपासनेस इस्लाममध्ये एकरूपता आणि सामाजिक दृष्टिकोन प्रदान करून 'नमाज'च्या रूपात अत्यंत प्रभावी बनविले. हिंदू धर्मात दानाची महत्त्व दाखविली गेली. मात्र त्यासाठी पात्र, ब्राह्मणाला समजले गेले. इस्लाममध्ये 'जकात'ला अनिवार्य करून त्याची पात्रता निर्धनांसाठी घोषित करून समाजवादाचा पाया रचला गेला. इस्लामचे अनिवार्य दान विशेष आहे. व्रताचे महत्त्व हिंदू धर्मांत अधिक आहे. 'चंद्रामण व्रत' जे एका महिन्याच्या चंद्रकलेनुसार प्रारंभ होते आणि समाप्त होते, 'रोजा' समान आहे, आता लुप्त झाले आहे. परंतु अजून निर्जला एकादशी व अन्य व्रत आहेत. परंतु हे विविध वेळी वैकल्पिक असून स्त्रियांपर्यंतच मर्यादित आहेत. याउलट रोजाची अनिवार्यता, एकरूपता, सुनिश्चितता सार्वभौमिकता आणि इतर नियमांशी समन्वय गौरवपूर्ण आहे. रोजाचा इस्लाममध्ये सामाजिक दृष्टिकोन आहे. परंतु हिंदूचे व्रत हे व्यक्तिगत स्वरूपाचे आहेत. रोजाच्या समाप्तीवर विशाल सामूहिक नमाज आणि परस्पर अभिवादन, समता, बंधुभावाचे साक्षात दर्शन घडते. तीर्थांचे प्रतिरूप हज यात्रा आहे. हिंदूचे असंख्य तीर्थस्थाने आहेत, ज्यांचा संबंध विश्वास, पौराणिक कल्पना/कथा यांच्याशी आहे. मात्र इस्लामची हजयात्रा एकरूपता, गंभीरता, विश्वबंधुभाव आणि धार्मिकतेचे व ऐतिहासिकतेचे प्रतीक आहे. थोडक्यात इस्लामचे पाच अध्यादेश हिंदुत्त्वात मूळ रूपाने उपस्थित आहेत. ज्या अर्थी हिंदू धर्म सगळ्यांत जुना व प्राचीन धर्म आहे या दृष्टीने मुहम्मद (स.) यांच्या प्रेषित्त्वाचे एक ज्वलंत उदाहरण व साक्ष आहे. इस्लामने या नियमांना अधिक प्रभावी बनविले आणि समाजासाठी आश्चर्यकारकरित्या फायदेशीर

बनविले. सगळ्यांत सुखद गोष्ट अशी की 'इस्लाम'मध्ये तौहीद (एकेश्वरत्व) सोडून अन्य चार नियमांत अनिर्वाय परिस्थितीत सूट देण्यात आली आहे. एकेश्वरत्व तर हृदय, डोके आणि आत्मा या तिघांचा वापर करून सर्वशक्तिमान ईश्वरावर विश्वासाशी संबंधित आहे. यात कोणत्याही प्रकारची सूट नाहीच नाही. यात सूट देणे म्हणजे 'शिर्क' (अनेकेश्वरत्व). इतर धर्मांत एकेश्वरत्वात सूट आणि फेरबदलाच्या कारणाने भ्रष्टता आली आहे. इस्लाम प्रत्येक शिर्कला शिर्क समजतो. म्हणून एकेश्वरत्व सुरक्षित आहे आणि हीच 'इस्लाम'ची विशेषता आहे. इस्लाममध्ये जकात, रोजा आणि हजमध्ये विशेष परिस्थितीत, शारीरिक दुर्बलता, आजारपण आणि इतर अडचणीच्या वेळेस सूट देण्यांत येते. उदाहरणार्थ, जकातसाठी असमर्थ व्यक्तीस विकल्प दिला गेला आहे की तो भांडण-तंट्यापासून लांब राहिला तर हीच त्याची जकात. इस्लामचे नियम थोडक्यात व सरळ-सोपे आहेत. जनसाधारण व विशेष समुदाय दोघांना सहज समजेल असे आहेत. तौहीदला सोडून शारीरिक आणि आर्थिक अडचणीच्या वेळेस जकात, रोजा आणि हज यात्रेला सूट आहे. त्यामुळे रोग्यांना, अपंगांना आणि आर्थिक संकटात सापडलेल्यांना सूट देण्यात आलेली आहे. इतर धर्मांत हे सर्व अपमानित आहेत, उपेक्षित आहेत. इस्लामने खर्चित कर्मकांडाचे निराकरण केले. व्यावहारिक नियम, नैतिक व सामाजिक नियमांत समन्वय आहे. धर्म सगळ्यांचा आहे ज्यांत पुरुष, स्त्रिया, अनाथ, दास, अपंग, व्यक्ती, परिवार, समुदाय, राष्ट्र सर्व सामील आहेत. सगळ्या समस्यांचे समाधानाची क्षमता राखणारा इस्लाम सगळ्यांत जास्त कल्याणकारी धर्म आहे.

## इस्लामची वैशिष्ट्ये

थोडक्यात इस्लामची प्रमुख वैशिष्ट्ये खालीलप्रमाणे आहेत.

१) इस्लामची सगळ्यांत महत्त्वाची विशेषता त्याचे शुद्ध व स्वच्छ एकेश्वरत्व. हिंदू धर्माचे ईश्वर-कृत वेदांचे एकेश्वरत्व कालांतराने बहुदेववादांत हरवलेच नाही तर बहुदेववाद आणि अवतारवादानंतर ईश्वराला गौण समजले गेले. याचप्रकारे ख्रिश्चनांची त्रिमूर्ती, अर्थात ईश्वर, पुत्र आणि पवित्र आत्म्याची कल्पना हिंदूच्या अवतरवादासमान ईसाई धर्मांमध्येही ईश्वर मुख्य न राहून गौण झाला. याविरुद्ध इस्लामच्या एकेश्वरत्वात कोणत्याही प्रकारचा फरक अथवा परिवर्तन झाले नाही. याची ठेवण मजबूत आहे व त्यात मिश्रणाला संधी नाही. याचे कारण इस्लामचा आधारस्तंभ कलिमा (पवित्रवचन) आहे. मी स्वीकार करतो की ईश्वराशिवाय कोणीही पूज्य/उपास्य नाही आणि मुहम्मद (स.) ईश्वराचे दास आणि प्रेषित आहेत. मुहम्मद (स.) यांना ईश्वराने कुरआनमध्ये अधिकतर वेळेस

"अब्द" म्हटले आहे. ज्याचा अर्थ आज्ञाकारी दास व सेवक आहे. म्हणून ईश्वराचा दास ईश्वराचा अवतार असू शकत नाही. तो उपास्य होऊ शकत नाही.

२) इस्लाममध्ये दारूला सर्व पापांची जननी म्हटले आहे. इस्लाममध्ये फक्त नैतिकतेच्या आधारावर दारूबंदी नाही तर दंडनीय अपराध आहे अर्थात फटक्याची शिक्षा दिली जाते. इस्लाममध्ये सिद्धान्त म्हणून ताडी, भांग इत्यादी मादक पदार्थ निषिद्ध आहेत. हिंदू धर्मात मनाई आहे आणि नाहीही. विष्णुचे उपासक मदिरेला वर्जित मानतात आणि कालीचे उपासक शीव सारख्या देवाला भांग-धतुरा वापरणारा देव सांगतात. तसे शैवसुद्धा भांग, गांजा इ.चे सेवन करतात.

३) ज़कात अर्थात अनिवार्य दान. हे श्रेय केवळ इस्लामला जाते की पाच आधारभूत कृत्ये नमाज, रोजा, हज (काबाची तीर्थ यात्रा) मध्ये एक मुख्य काम 'जकात' देणे आहे. या दानाला प्राप्त करण्याचा मान गोरगरीब, निर्धनांना आहे, कर्ज न फेडू शकणाऱ्यांना आहे. श्रीमंताच्या संपत्तीत या लोकांचे हक्क प्रस्थापित केले आहेत. जकात घेणारे धनवानाच्या दारावर भिक्षुक बनून जाणार नाहीत तर शासनाने जकात वसूल करून ती गोरगरीबांना, गरजूंना वाटावी. गरीबांचा असा आदर कोणत्याही धर्मात नाही.

४) इस्लाममध्ये सर्व प्रकारच्या जुगाराची बंदी आहे. हिंदू धर्मात दिवाळीत जुगार खेळण्यास धार्मिक कार्य समजले जाते. ईसाई धर्मातसुद्धा जुगारावर प्रतिबंध नाही.

५) व्याज हा असा व्यापार आहे ज्यामुळे श्रीमंत अधिक श्रीमंत होतो आणि गरीब आणखीच गरीब होत जातो. समाजाला या अध:पतनापासून रोखण्यासाठी कोणत्याही धर्माने व्याजावर बंधने घातलेली नाहीत. इस्लाम हा एकमेव धर्म आहे ज्याने व्याजाला वर्जित ठरवले. व्याजाला नापसंती दर्शवून निषिद्ध घोषित केले. कुरआन याला सोडून देण्याची आज्ञा करतो आणि सोडले नाही तर तंबी दिली आहे. (कुरआन २ : २७९)

६) **लाच :** इस्लामला हे श्रेय जाते की धार्मिक रूपाने लाच निषिद्ध ठरविले.
(कुरआन - २ : १८८)

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी लाच घेणाऱ्या, लाच देणाऱ्या दोघांवर ईश्वराचा धिक्कार असो, असे म्हटले आहे.

७) इस्लामनेच सर्वप्रथम स्त्रियांना संपत्तीचा अधिकार दिला. मृतकांच्या संपत्तीत स्त्रियांना वारसदार ठरविले.[१] हिंदू धर्मात विधवा स्त्रीच्या पुनर्विवाहचे नियम नाहीत. हेच

---

१. कुरआन (४:११-१२, ४:३३, ४:१७६) हे कायदे निर्धारित केल्यानंतर कुरआन सांगतो की अल्लाहने सीमा निर्धारित केली आहे. त्यांचे उल्लंघन करणाऱ्याला (नरकात) आगीत टाकले जाईल आणि तो तिथे कायमचा राहील आणि ही मोठी शिक्षा आहे.

काय पूर्वी मृत पतीच्या शवाबरोबर विधवेलाही जाळण्याची प्रथा होती. ज्या ठिकाणी सतीची प्रथा नव्हती तिथे विधवेला चांगले अन्न, वस्त्र दिले जात नव्हते. शुभ कार्यात तिला येऊ देत नसत. ती सर्वत्र तिरस्कृत असायची आणि जगणे ओझे व्हायचे. इस्लाममध्ये विधवेसाठी कठोर नियम नाहीत. पतीच्या मृत्यूनंतर चार महिने दहा दिवस उलटल्यानंतर ती दुसरे लग्न करण्यास पात्र होते.

८) इस्लामने काही अनिवार्य परिस्थितीत स्त्रियांना पतीत्याग करण्याचा अधिकार प्रदान केला आहे. हिंदू धर्मात हा अधिकार नाही. भारतात आता संविधानव्दारा स्त्रियांना अनेक अधिकार मिळू लागले आहेत.

९) हा 'इस्लाम' धर्मच आहे ज्याने एखाद्या स्त्रीवर तिच्या चारित्र्यावर आळ घेणाऱ्यासाठी चार साक्षीदार उपस्थित करणे अनिवार्य ठरवले आहे. जर आरोप करणारे चार साक्षीदार ज्यांनी डोळ्यांनी पाप होताना पाहिले आहे, हजर करू शकले नाही तर त्यांना ऐंशी चाबकाचे फटके ही शिक्षा ठरवली आहे. या संदर्भात श्री रामचंद्र आणि आदरणीय मुहम्मद (स.) यांच्या आचरणाचा आपण विचार करू या. मुहम्मद (स.) यांच्या अर्धांगिनी आएशाच्या सतीत्त्वावर लांछन लावले गेले, जे खोटे ठरले. माननीय आएशा (रजि.) निर्दोष सिद्ध झाल्या, परंतु रामचंद्रजींनी केवळ संशयावरून सीतादेवीचा त्याग केला. जेव्हा की सीता अग्निपरीक्षेद्वारा स्वत:ला निर्दोष ठरली होती. जर पुरुष रामचंद्रजींचे या बाबतीत अनुकरण करू लागले तर किती निर्दोष महिलांचे जीवन नष्ट होतील. स्त्रियांना इस्लामचे आभार मानले पाहिजेत की निर्दोष स्त्रियांवर दोषारोप ठेवण्यासाठी वैधानिक व कायदेशीर अपराध ठरवले.

१०) इस्लाम धर्माने कमी मोजणे, कमी मापणे याला अपराध ठरविले व धार्मिक पाप ठरविले आणि परलोकात या बाबतीत विचारले जाईल व न्याय केला जाईल.

११) इस्लामने अनाथांच्या संपत्ती बळकाविण्याला धार्मिक पाप ठरविले.

(कुरआन ४:१०, ४:१२७)

१२) इस्लामची शिकवण ही आहे की ईश्वराशी प्रेम करायचे असेल तर सृष्टीशी प्रेम करा.

१३) इस्लाम म्हणतो की ईश्वर त्या मनुष्यावर प्रेम करतो, जो त्याच्या दासांवर अधिक चांगुलपणा दाखवतो.

१४) इस्लाम म्हणतो, जनावरांवरही प्रेम करा, ईश्वर तुमच्यावर प्रेम करेल.

१५) दया करणे ईमानची खूण आहे. ज्यात दया नाही त्यात ईमान नाही.

१६) कोणाचा ईमान पूर्ण नाही जोपर्यंत तो आपल्या सहकाऱ्याला आपल्या सारखाच जाणत नाही.

१७) इस्लामनुसार इस्लामी राज्य अधर्म (कुफ्र)ला सहन करू शकेल पण अत्याचार आणि अन्यायाला सहन करू शकणार नाही.

१८) इस्लाम म्हणतो, ज्याचा शेजारी त्याच्या अत्याचारापासून सुरक्षित नाही तर तो ईमानधारक नाही.

१९) जी व्यक्ती कुणा दुसऱ्याची एक वीत जमीन हडप करेल त्याच्या गळ्यात प्रलयदिनी सातपट जमीन लटकवली जाईल.

२०) इस्लाममध्ये समानता, बंधुभाव इतका आहे की जगात कोणत्याही धर्मात नाही. हिंदू धर्मात हरिजन घृणित आणि अपमानित आहेत. या भावनेविरुद्ध २५०० वर्षापूर्वी महात्मा बुद्धांनी आवाज उठविला होता. त्यांच्या अनुयायींनी या भावनेला बदलण्यासाठी खूप प्रयास केले. आधुनिक काळात गांधीजींनी अथक प्रयत्न केले. परंतु तेही हिंदूच्या या भावनेला बदलण्यात सफल झाले नाही. गोऱ्यांचे चर्च वेगळे, काळ्यांचे चर्च वेगळे. गोऱ्यांच्या चर्चमध्ये निग्रो लोक प्रार्थनेसाठी प्रवेश करू शकत नाहीत. दक्षिण आफ्रिकेत या युगात गौरवर्ण ईसाई काळ्या वंशाच्या लोकांवर अत्याचार करीत आहेत आणि समाजवादाची घोषणा सगळीकडे केली जात आहे आणि राष्ट्रसंघाचे नियंत्रण आहे. या भेदभावाला मुळासकट उपटून टाकण्याचे कार्य इस्लामने केले आहे. याच आफ्रिका देशात एका ज्यूचे मुस्लिम होताच त्याला मुस्लिम समाज तात्काळ स्वीकारून आपल्यात सामील करून घेतो. तसे ईसाई धर्मात ईसाई होणाऱ्या माणसाला समाजात स्थान मिळत नाही. गांधीजींनी इस्लामच्या प्रेरक शक्तीबाबत मनापासून प्रसन्नता व्यक्त केली आहे.[१]

---

१. राजेंद्र नारायण लालजी यांनी थोडक्यात आपले विचार मांडले. सर्वसाधारण लोकांसाठी सरळ सरळ या विषयांची माहिती व्हावी. समता आणि बंधुत्वासंबंधी संक्षिप्त रूपाने इस्लामची शिकवण आणि काही उदाहरणे सादर केली तर उपयुक्त होतील.

इस्लाम मूळ रूपाने मानवतेला अभेद्य ठरवितो. सर्व मानव एकाच माता-पित्याची संतान आहे. पवित्र कुरआनात अल्लाह म्हणतो,

“लोक हो, आम्ही तुम्हाला एका पुरुष व एका स्त्री पासून निर्माण केले आणि मग तुमची राष्ट्रे आणि वंश बनविले जेणे करून तुम्ही एकमेकांना ओळखावे. वास्तविकत अल्लाह जवळ जास्त प्रतिष्ठित तो आहे जो तुमच्यापैकी सर्वांत जास्त ईशपरायण आहे. निश्चितच अल्लाह सर्वकाही जाणणारा आणि खबर राखणारा आहे.” *(दिव्य कुरआन ४९: १३)*

ही आयत (श्लोक) फार महत्त्वपूर्ण आहे. यात तीन गोष्टींचा उल्लेख आहे. त्यांना न

समजून मानवसंतान देश, जात आणि वर्णांत विभागली गेली. माणूस हे विसरला की तो एकाच माता-पित्याची संतान आहे. मानव इतिहास ज्या कटूतेने भरला आहे, कलह, रक्तपात, द्वेषाने भरलेला आहे. हे मिथ्या भेदभावामुळेच आहे. या आयतीत हे सत्य समोर ठेवले आहे की संतान, गोत्र, परिवार, जाती आणि देशभेदचा अर्थ असा नाही की यांच्यात कोणी कोणाहून श्रेष्ठ नाही.

सर्व माणसे पूवीच्या एकाच भागात मावणार नाहीत आणि सर्वांना उपजीविका मिळणार नाही. यामुळे वेगवेगळे देश तयार झाले, जाती बनल्या, परिवार तयार झाले, गोत्र झाले. एकमेकांची ओळख व्हावी म्हणून जाती-जमाती झाल्या आणि एक दुसऱ्याचे हक्क अदा करीत एका व्यवस्थेत राहावे.

तिसरी गोष्ट ही सांगितली की वास्तविक श्रेष्ठतेचा आधार संतान, गोत्र, वर्ण, जात आणि देश नाही. मात्र ते संयम, चारित्रता व सुकर्म आहेत. जी व्यक्ती संयमी. चारित्र्यवान आणि सुकर्मी आहे मग ती कोणत्याही देशाची, जाती व गोत्राची, वर्णाची असो, ती श्रेष्ठ आहे. जी व्यक्ती याच्या विरुद्ध आहे मग ती हीन आहे, मग ती कोणत्याही जातीची, गोत्राची आणि वर्णाची असो.

महाईशदूत आदरणीय मुहम्मद (स.) यांचे सांगणे आहे, "लोक हो, सर्व मानवजात दोन भागांत विभक्त आहे. एक सूकर्मी आणि संयमी जे ईश्वराजवळ आहे, दुसरा कूकर्मी आणि दुराचारी जो ईश्वरा समक्ष अपमानित आहे. सर्व माणसे एकाच आदमाची औलाद आहेत आणि आदमला ईश्वराने मातीने बनविले आहे."

महाईशदूतानी आपल्या जीवनाच्या अंतिम हजयात्रेच्या वेळी, जेव्हा अरबच्या काना-कोपऱ्यातून मुस्लिम हज करण्यासाठी मक्केला आले होते. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी अरफ़ातच्या मैदानावर हे भाषण दिले. "लोक हो, खबरदार, तुम्हा सगळ्यांचा ईश्वर एक आहे. कुणा अरबाला इतर लोकांवर, तसेच इतर लोकांना अरबांवर, कोणा गोऱ्याला काळ्यावर, कोणा काळ्याला गोऱ्यावर प्राधान्य प्राप्त नाही. शिवाय त्यांत जे संयम पाळतात सुकर्म करतात, आणि ईश्वराजवळ तोच प्रतिष्ठावान आहे."

या प्रकारचे उपदेश आणि आदेश म्हणण्यापर्यंत सीमित नव्हते, प्रत्यक्षात अमलात आणले गेले. पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या अनुयायीनी मग ते अरबचे असोत, इतर ठिकाणचे असोत, स्वतंत्र असोत अथवा गुलाम (दास) असोत त्यांना कुरैशच्या लोकांबरोबर बंधुभाव व समानता तर लाभलीच व काहींना तर प्राधान्यही मिळाले. शंभर दोनशे वर्षानंतर मुस्लिम होणारे इतर देशातील विद्वान अरबचे धार्मिक नेते झाले. आजही खाण्यापिण्यात धार्मिक विद्यालयांत, मशिदीत भाऊबंदाची प्रथा पाहावयास मिळू शकते. इस्लामी समता आणि बंधुभावाचे मनोहर व प्रभावकारी दृष्य मक्केत हजच्या वेळेस पाहायला मिळते. जगातील २०० राष्ट्रांच्या हज यात्रींची एकत्रित प्रार्थना पाहण्यासारखी असते. सर्व बंधुभावाने एकमेकांना भेटतात.

-०- समाप्त -०-